**मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर**
**यांचे न्यायालयीन आदेशानुसार**
**नुकसानभरपाई अदा करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीओटी ०९१५/प्र. क्र.११६/१५/तुरूंग-३**
गृह विभाग, मंत्रालय
मुख्य इमारत, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
तारीख: १२ मे, २०१५

वाचा-

१) **मा. उच्च न्यायालय, बॉम्बे, नागपूर खंडपीठ येथे दाखल क्रिमिनल अपील क्र. ३८०/२००६ व क्रिमिनल अपील क्र. ८८/२०१५ प्रकरणीचे दिनांक ३ मार्च, २०१५ रोजीचे आदेश**

प्रस्तावना -

रमा नारायण जोगदंड व सावित्रीबाई नारायण जोगदंड यांना रमा जोगदंड हिच्या नवजात बालकाची हत्या केल्याप्रकरणी अतिरिक्त सत्र न्यायाधीश, पुसद यांनी भा.दं.वि. कलम ३०२ सह ३४ अंतर्गत जन्मठेप व रू. ५००/- दंड, तथा दंड न भरल्यास एक महिन्याच्या सक्तमजूरीची शिक्षा दिनांक १७.१.२००६ रोजी सुनावली होती. सदर शिक्षेविरूद्ध रमा जोगदंड हिने सन २००६ मध्ये मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे दाखल केलेल्या क्रिमिनल अपील क्र. ३८०/२००६ व सावित्रीबाई जोगदंड हिच्या प्रकरणी सन २०१५ मध्ये दाखल करण्यात आलेल्या क्रिमिनल अपील क्र. ८८/२०१५ प्रकरणी मा. उच्च न्यायालय, बॉम्बे, नागपूर खंडपीठ यांनी दि. ३.३.२०१५ रोजीच्या संदर्भ-१ मधील आदेशान्वये भा.दं.वि. कलम ३०२ सह ३४ मधून दोन्ही महिला बंदींची निर्दोष मुक्तता केली असून सावित्रीबाई जोगदंड हिस कारागृहातून तात्काळ मुक्त करण्याचे व रमा जोगदंड हिचे जामीनपत्र रद्द करण्याचे आदेश देताना दोन्ही स्त्री बंदींच्या नावे राष्ट्रीयीकृत बँकेत खाते उघडून त्यांना प्रत्येकी रू. १,५०,०००/- ची नुकसानभरपाई देण्याच्या सूचना राज्य शासनास दिल्या आहेत.

## शासन निर्णय-

संदर्भीय न्यायालयीन आदेशानुसार सदर न्यायालयीन प्रकरणातील अपीलकर्त्या रमा नारायण जोगदंड व सावित्रीबाई नारायण जोगदंड यांना भरपाई रक्कम म्हणून प्रत्येकी रू. १,५०,०००/- अदा करण्यास शासन मान्यता देत आहे. सदर आर्थिक मोबदला अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अधीक्षक, नागपूर मध्यवर्ती कारागृह, नागपूर यांना प्राधीकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी दोन्ही महिला बंद्यांच्या नावे राष्ट्रीयीकृत बँकेत खाते उघडून नुकसानभरपाईची रक्कम संबंधीतांना तातडीने अदा करून त्याची पोच पावती शासनास सादर करावी

व कार्यपूर्ततेचा अहवाल संबंधीत वकीलांमार्फ़त मा. उच्च न्यायालय, बॉम्बे, नागपूर खंडपीठ यांना सादर करावा.

सदर शासन निर्णय संदर्भीय न्यायालयीन आदेशानुसार तथा विधि व न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५५/६२४/Crim. Gen/Confl./२०१५/'A' Br., Dt: २७th April, २०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१२१०४१२६५१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Keshav Jadiye

Digitally signed by Deepak Keshav Jadiye
DN: CN = Deepak Keshav Jadiye, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Home Department
Date: 2015.05.12 13:21:04 +05'30'

**(दीपक जडीये)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. अपर पोलिस महासंचालक व पोलिस महानिरीक्षक (कारागृह), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर
५. पोलिस अधीक्षक, यवतमाळ
६. अधीक्षक, नागपूर मध्यवर्ती कारागृह, नागपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
८. वित्त विभाग (व्यय-८), मंत्रालय, मुंबई
९. गृह विभाग (बीयुडी-१), मंत्रालय, मुंबई
१०. गृह विभाग (तुरूंग-२), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
११. निवडनस्ती (तुरूंग-३)